**नक्षलग्रस्त आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रातील गावात नक्षलवाद्यांना गावबंदी केलेल्या गावांना प्रोत्साहनात्मक अनुदान मंजूर करणेबाबत. सन-२०१८-१९**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नविका-२४१८/६४६/प्र.क्र. ७१/का-१४१७**
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : ३० नोव्हेंबर, २०१८

वाचा : १) गृह विभाग शासन निर्णय क्रमांक एनएएक्स-११०९/प्र.क्र. ६२९/विशा-१ ब दिनांक १८ मार्च, २०११
२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र. ६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८

प्रस्तावना :

नक्षल चळवळीस आळा घालण्याच्या दृष्टीने बिगर आदिवासी क्षेत्रातील गावांमध्ये नक्षलवाद्यांना गावबंदी योजना लागू करण्याचा निर्णय गृह विभागाच्या उपरोक्त शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. त्यानुसार नक्षलग्रस्त आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रातील गावात नक्षलवाद्यांना गावबंदी केलेल्या गावांना प्रत्येकी रुपये ३.०० लाख एवढा निधी त्या गावांच्या विकासात्मक कामासाठी प्रोत्साहनात्मक अनुदान म्हणून मंजूर करण्यात येतो. याबाबत विभागीय आयुक्त, नागपूर यांच्यामार्फत प्राप्त झालेल्या जिल्हाधिकारी, गडचिरोली यांच्या प्रस्तावातील १५ गावांना गावबंदी योजनेअंतर्गत एकूण रु. ४५.०० लाख एवढे प्रोत्साहनात्मक अनुदान उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

गडचिरोली जिल्ह्यातील १) गट्टेगुडा (२) गनपूर (३) काशीपूर (४) अंकोला, ता. चामोर्शी (५) विहिरगाव टोली (६) शाहूटोला (७) मुरमाडी टोला (८) वाकडी (९) चांभार्डा (१०) चांभार्डा टोला (११) राजगाटा चेक (१२) राखी टोली (१३) चुरमुरा माल (१४) महादवाडी (१५) मोहटोला, ता. गडचिरोली या एकूण १५ गावांना सदर योजनेअंतर्गत एकूण रु. ४५.०० लाख (रुपये पंचेचाळीस लाख फक्त) एवढे प्रोत्साहनात्मक अनुदान या शासन निर्णयान्वये उपलब्ध करून देण्यात येत आहे.

२. सदर निधी खर्च करताना संदर्भाधीन शासन निर्णय व परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. सदरचा खर्च मागणी क्रमांक ओ-७, ३४५१ सचिवालय-आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (०१) नियोजन विभाग, (०४) (०१) नक्षलवादी भागासाठी विशेष कृतीदल (योजनांतर्गत), ३१ सहा. अनुदाने (वेतनेत्तर) (३४५१ ०६५४) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध करून दिलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर निधी जिल्हाधिकारी, गडचिरोली यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करून देण्यात येत आहे. सदर निधी त्यांनी संबंधित ग्रामपंचायतीस एकाच हफ्त्यात अदा करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली यांना मंजूर करावा.

५. या उपशीर्षाखाली होणा-या खर्चासाठी जिल्हाधिकारी, गडचिरोली हे नियंत्रक अधिकारी असतील व जिल्हा नियोजन अधिकारी, गडचिरोली हे आहरण व संवितरण अधिकारी असतील. सदर निधीच्या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच खर्चाची माहिती वेळोवेळी शासनाला देण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी म्हणून जिल्हाधिकारी, गडचिरोली यांची राहील.

६. सदर ज्ञापन वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र. ६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून व गृह विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ACS (H) ४२९८ /विशा-१ ब दिनांक २२/११/२०१८ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८११३०१२३६४९६२१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2018.11.30 12:43:17 +05'30'

**( प्रियांका रं. छापवाले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर

२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर

३. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर

४. सह सचिव (विशा-१ब), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

५. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली

६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली

७. जिल्हा पोलीस अधिक्षक, गडचिरोली

८. सह संचालक, लेखा व कोषागरे, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई-३२

९. अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा - कुर्ला कॉम्प्लेक्स, मुंबई-५१

१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

११. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली

१२. उप आयुक्त, नियोजन, विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर

१३. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली

१४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गडचिरोली

१५. कार्यासन अधिकारी, नियोजन विभाग (का-१४११/१४१४/का-१४२४), मंत्रालय, मुंबई

१६. निवड नस्ती (का-१४१७), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.